**सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास ३५-भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत....**
**(कार्यक्रम खर्च)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि-१४२२/प्र. क्र.१६५/७-अे,**
**दिनांक : ३१ मार्च, २०२३.**

**वाचा :-** १)वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३ व दि.१६.०३.२०२३.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मफुवि-१४२२/प्र.क्र.१२१/७-अे, दि.२०.०७.२०२२,
३)कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मफुवि-१४२२/प्र.क्र.१६५/७-अे, दि.११.०१.२०२३ व दि.२४.०३.२०२३.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. मफुवि-१४२२/प्र.क्र.२६२/७-अे, दि.०८.०२.२०२३,
५) नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.मफुकृवि/बांध/६०३३/२०२३, दि.०८.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. डी-३, ०१, पीक संवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००७२, या लेखाशीर्षांतर्गत ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या बाबीकरीता सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी रु.८४७०.०० लाख निधी वितरीत करण्यास संदर्भ क्र.०२ ते ०४ च्या शासन निर्णयांन्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००७२, या लेखाशीर्षांतर्गत ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या बाबीकरीता सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता, महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००७२, या लेखाशीर्षांतर्गत **३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान** या बाबीकरीता सुधारीत अंदाजपत्रकीय तरतुदीतून खालीलप्रमाणे एकूण रु.१०,३०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी तीस लाख फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/ उद्दीष्ट | तपशिल | प्रशासकीय मान्यता आदेश | प्रशासकीय मान्यता किंमत (अनावर्ती) | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | मागणी क्र. डी-३, ०१ पिकसंवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम), २४१५ ००७२, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान | मौजे काष्टी, ता.मालेगाव, जि. नाशिक येथे कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय व अन्न तंत्रज्ञान महाविद्यालय बांधकाम करणे | शा.नि.क्र. मफुवि-१४२१प्र.क्र.१४१ /७-अे दि.१०.१२.२०२१ | **१६९२४.००** | **१०३०.००** |
| | | **एकूण** | | **१६९२४.००** | **१०३०.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

२) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

४) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

५) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२२-२३ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांकःअेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दि.२७/०९/१९७२ आणि शासन निर्णय, क्रमांक: कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दि. २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२८/का.१४३१, दि.२८.०२.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६१/२०२३/व्यय-१, दि.०६.०३.२०२३ नुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३३१२११५१५३४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2023.03.31 21:20:10 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
२. प्रधान सचिव (कृषि), यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
४. कुलगुरु /कुलसचिव / नियंत्रक ,महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर,
५. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
६. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर,
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर /उपकोषागार अधिकारी, अहमदनगर,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
११. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१२. कक्ष अधिकारी ,वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१३. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१४. कक्ष अधिकारी, कार्यासन ६अे /२अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१५. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.